**प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१९ साठी राज्य शासनाच्या हिश्याची पिक विमा हप्ता अनुदानापोटी रू.४८,२४,५४,१३२/- इतकी रक्कम वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११ अे,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ९ जुलै, २०२०.

संदर्भ: -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११- अे, दि.१६.८.२०१९.
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.०१/११- अे,दि.२७.११.२०१९.
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.१९२/११- अे, दि.१८.२.२०२०.
४. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.१३१/११- अे, दि.२५.२.२०२०.
५. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२०/प्र.क्र.१३३/११- अे,दि.२६.३.२०२०.
६. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-.२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४.५.२०२०.
७. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृषिआ / सां.८/ प्रपिवियो /१५९७७ /२०२० दि.७.७.२०२०.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०१९ मध्ये राज्यात दि.२२.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये भारतीय कृषि विमा कंपनी व बजाज अलियान्स इंशुरन्स कंपनी या २ विमा कंपन्यांमार्फत राबविण्यात येत आहे. कृषि आयुक्त कार्यालयाने संदर्भ पत्र क्रं (७) अन्वये प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१९ अंतर्गत उपरोक्त २ कंपन्यांना पिक विमा हप्ता अनुदानापोटी द्यावयाचा उर्वरित राज्य हिस्सा अनुदान **रू.४८,२४,५४,१३२/-** इतकी रक्कम वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. त्यास अनुसरून सदर रक्कम पिक विमा हप्ता अनुदानापोटी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१९ अंतर्गत कृषि आयुक्तालयाने शिफारस केल्यानुसार विमा कंपन्यांना पिक विमा हप्ता अनुदानापोटी द्यावयाचा उर्वरित राज्य हिस्सा अनुदान **रू.४८,२४,५४,१३२/-** इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. संबंधित विमा कंपन्यांना यापुर्वी दिलेल्या व आता द्यावयाच्या पीक विमा हप्ता अनुदान राज्य हिस्सा अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| विमा कंपनी | एकूण पीक विमा हप्ता राज्य हिस्सा अनुदान रु. | यापुर्वी अदा करण्यात आलेले अनुदान रु. | विमा कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार मागणी केलेली व आता अदा करावयाचे पीक विमा हप्ता राज्य हिस्सा अनुदान रु. |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| भारतीय कृषि विमा कंपनी लि. | १८०५५३२५४४८ | १७६०३१२९३१८ | ४५२१९६१३० |
| बजाज अलियांझ जनरल इं. कं. लि. | १५५२९५४०८९ | १५२२६९६०८७ | ३०२५८००२ |
| **हंगाम एकुण** | **१९६०८२७९५३७** | **१९१२५८२५४०५** | **४८२४५४१३२** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**

**२४०१ - पीक संवर्धन**

**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसारच खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौपरिक संदर्भ क्र९९/२०२०/व्यय-१,दि.२२.६.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०९१६५५०१७६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB K RASKAR

(बा.कि. रासकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२

३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
१२.उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).